**“गौणशीर्ष ८०० इतर जमा / खर्च याच्या वापराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. बीजीएम-२०१६/प्र.क्र.५२६/अर्थसंकल्प-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०२ जानेवारी, २०१७.

**संदर्भ :** प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी)-१,महाराष्ट्र,मुंबई यांचे क्रमांक TM/Ch-१/Home/ UOR/७१/२०१६-१७/१३७१, Dt. २७.१०.२०१६ चे पत्र

**प रि प त्र क**

सर्वसाधारण नियमानुसार शासनाच्या लेख्यांच्या व्यवहाराचे वर्गीकरण जमा व खर्च हयाबाबतच्या हेतुप्रमाणे होते . जेव्हा योग्य गौणशीर्ष उपलब्ध नाहीत व जमा / खर्च यांच्या बाबी इतर गौणशीर्ष यांचेशी संबंधित नसल्यास किंवा गौणशीर्षासाठी अर्थसंकल्पीय / पुरक तरतूद करण्यास शेवटच्या क्षणी वेळेच्या कमतरतेमुळे असे प्रस्ताव प्राप्त झाल्यास अपवादात्मक परिस्थितीत “८०० इतर जमा /खर्च” या गौणशीर्षाचा वापर महालेखापाल कार्यालयाच्या सहमतीने करण्यात येतो. तथापि, “८०० इतर जमा / खर्च” या गौणशीर्षाचा सतत वापर केल्यामुळे लेखे अपारदर्शक बनण्याची शक्यता आहे. त्यामुळे सुसुत्रीकरण, प्रमाणिकीकरण व नियोजनपूर्वक वाटपाच्या प्रक्रियासाठी योग्य ते गौणशीर्ष प्रस्तावित केले गेले पाहिजे व गौणशीर्ष ८०० याचा वापर जेवढा शक्य आहे तेवढा टाळला पाहिजे, असे महालेखापाल कार्यालयाचे मत आहे. तसेच जेव्हा मुख्यलेखाशीर्षाखाली योग्य ते गौणशीर्ष उपलब्ध नसेल तेव्हा शक्यतो शासनाचे महानियंत्रक व लेखापरिक्षक यांच्याकडे योग्य त्या गौणशीर्षासाठी मागणी करणे आवश्यक आहे. तरी अर्थसंकल्पीय अंदाजाद्वारे तसेच पुरक मागण्यांद्वारे करण्यात येणारी अर्थसंकल्पीय तरतूद अचूक व पारदर्शक लेख्यांमध्ये होईल, याबाबत लक्ष देण्यात यावे व तशा प्रकारच्या सूचना सर्व संबंधित प्रशासकीय विभागांना देण्यात याव्यात, असे प्रधान महालेखाकार कार्यालय, (लेखा व हकदारी)-१, महाराष्ट्र, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्राद्वारे कळविलेले आहे.

२. महालेखापाल, मुंबई यांच्या वरील पत्रातील नमूद केलेल्या बाबी विचारात घेऊन यापुढे अर्थसंकल्पीय अंदाजाद्वारे तसेच पुरक मागण्यांद्वारे करण्यात येणारी तरतूद योग्य त्या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीत करण्याची दक्षता घेण्यात यावी. जेणेकरुन लेख्यांचे वर्गीकरण अचूक व पारदर्शक होईल.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०१०२१५४९३८६१०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant K. Patil

Digitally signed by Vasant K. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=FINANCE DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16a60323ef3beff915e7cf13b9836a7df2ad6df610965aab153a71bdb81c36c1, cn=Vasant K. Patil
Date: 2017.01.02 15:53:29 +05'30'

(व. कृ. पाटील)
सह सचिव, वित्त विभाग.

**प्रति,**

१. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सह सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)(व्हीएलसी शाखा),महाराष्ट्र,मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)(व्हीएलसी शाखा),महाराष्ट्र,नागपूर .
६. महालेखापाल (लेखापरीक्षा ),महाराष्ट्र,मुंबई .
७. महालेखापाल (लेखापरीक्षा ),महाराष्ट्र,नागपूर .
८. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
९. निवासी लेखा अधिकारी,मुंबई
१०.अर्थसंकल्प शाखेतील सर्व कार्यासन,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
११.निवड नस्ती,अर्थसंकल्प-२,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.